सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानांतर्गत सांगली मिरज कुपवाड महानगरपालिकेस भुयारी गटार टप्पा क्र.२ या प्रकल्पासाठी राज्य शासनाच्या हिश्श्याचे दुसऱ्या हप्त्याचे अनुदान वितरण.

महाराष्ट्र शासन

नगर विकास विभाग

शासन निर्णय क्रमांकः नगरो-२०१४/प्र. क्र.२१९/नवि-३३

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

दिनांक: १२ फेब्रुवारी २०१५

वाचा-

१) नगर विकास विभागाचा शासन निर्णय क्र. एनयुआर-२००८ /प्र.क्र.२०३ /नवि-३३, दि. २०/०२/२०१०.

२) नगर विकास विभागाचा शासन निर्णय क्र. नगरो-२०११ /प्र.क्र.२१८/११/नवि-३३, दि. ३१/०३/२०१२.

३) नगर विकास विभागाचा शासन निर्णय क्र. नगरो-२०१२/प्र.क्र.१८९/नवि-३३, दि. २५/०३/२०१३.

४) नगर विकास विभागाचा शासन निर्णय क्र. नगरो-२०१४/प्र.क्र.११९/नवि-३३, दि. २१/०८/२०१४.

५) नगरपरिषद प्रशासन संचालनालयाचा क्र. नपप्रसं/नगरोत्थान/सांगली मिरज भुगयो/सं. क्र. ६५५१ /कक्ष १३ दि. ०२/१०/२०१४ रोजीचा प्रस्ताव.

प्रस्तावना -

राज्यातील वाढते नागरीकरण लक्षात घेऊन नागरी भागांचा दिर्घकालीन व सुनियोजित विकास करण्याच्या दृष्टीने संदर्भाधीन क्रमांक -०१ येथील शासन निर्णयान्वये महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाअभियान दि. २० फेब्रुवारी, २०१० पासून राज्यात कार्यान्वित आहे. सदर महाभियानातंर्गत सांगली मिरज कुपवाड महानगरपालिकेचा भुयारी गटार प्रकल्प(टप्पा क्र.२) मंजूर करण्यात आलेला आहे. संदर्भाधीन क्रमांक ०२ व ०३ येथील शासन निर्णयान्वये सांगली मिरज

कुपवाड महानगरपालिकेचा नगरोत्थान महाभियानातंर्गत मंजूर भुयारी गटार प्रकल्प(टप्पा क्र.२) साठी राज्य शासनाकडील अनुज्ञेय पहिल्या हप्त्याची रक्कम मंजूर करण्यात आली आहे.

**०२.** उपरोक्त संदर्भाधीन क्रमांक- ०५ येथील पत्रान्वये नगरपरिषद प्रशासन संचालनालयाकडून महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानातंर्गत सांगली मिरज कुपवाड महानगरपालिकेच्या भुयारी गटार प्रकल्प टप्पा क्र.२ साठी दुसऱ्या हप्त्याचा निधी वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनास प्राप्त झालेला आहे. त्या अनुषंगाने सदरहू महानगरपालिकेस नगरोत्थान महाभियानातंर्गत दुसऱ्या हप्त्याचा निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**०३.** संदर्भाधीन क्र. ०४ येथील शासन निर्णयातील तरतूदी नुसार संदर्भ क्रमांक ०१ येथील शासन निर्णय अधिक्रमीत करून, अभियानाच्या वित्तीय आकृतीबंधात व व्याप्तीत बदल करण्यात आला असून या शासन निर्णयाच्या तरतूदीनुसार सदरहू अभियानाची अंमलबजावणी आता केली जाणार आहे. त्या अनुषंगाने सदरहू शासन निर्णयाच्या परिच्छेद २ (ज) येथील अटी व शर्तींची पूर्तता केल्यास संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये पूर्वी मंजूर झालेले प्रकल्प सुधारीत वित्तीय आकृतीबंधानुसार निधी वितरणास पात्र ठरतील. त्या अनुषंगाने सुधारित वित्तीय आकृतीबंधानुसार निधी उपलब्ध होण्याच्या दृष्टीने संदर्भाधीन क्रमांक ४ येथील शासन निर्णयातील आवश्यक त्या सर्व अटी व शर्तींची पूर्तता संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने करावी. तथापि तूर्त प्रकल्पांतर्गत मंजूर व पायाभूत सुविधा विकास कामामध्ये अडथळा होऊ नये या दृष्टीने सद्यस्थितीत संदर्भाधीन क्रमांक ०५येथील पत्रान्वये नगरपरिषद प्रशासन संचालनालयाने प्रस्तावित केल्यानुसार दुसऱ्या हप्त्याचा निधी वितरीत करावयाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय—

महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानांतर्गत मंजूर सांगली मिरज कुपवाड महानगरपालिकेचा भुयारी गटार प्रकल्प(टप्पा क्र.२) या प्रकल्पास खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे राज्य शासनामार्फत अनुज्ञेय असलेल्या दुसऱ्या हप्त्याच्या रकमेपैकी खाली दर्शविल्यानुसार निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**(रुपये कोटीत)**

| क्र. | स्थानिक स्वराज्य संस्थेचे नाव व वर्गवारी | योजनेचे स्वरूप | मंजूर एकूण प्रकल्प किंमत (१००%) | संदर्भ क्र. ४ येथील शासन निर्णयान्वये राज्य शासनामार्फत अनुज्ञेय हिस्सा (प्रकल्प किंमतीच्या ७० टक्के) | संदर्भ क्र. ४ येथील शासन निर्णयान्वये नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचा हिस्सा (प्रकल्प किंमतीच्या ३० टक्के) | संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये राज्य शासना-मार्फत अनुज्ञेय हिस्सा (प्रकल्प किंमतीच्या ५० टक्के) | संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचा हिस्सा (प्रकल्प किंमतीच्या ५० टक्के) | संदर्भ क्र. २ व ३ येथील शासन निर्णयान्वये यापूर्वी वितरीत केलेले अनुदान | संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये राज्य शासनामार्फत अनुज्ञेय अनुदानापैकी वितरीत करावयाचे उर्वरित अनुदान | सध्या वितरीत करावयाचा राज्य शासनाच्या हिश्श्याचा निधी | राज्य शासनाने सध्या वितरित करावयाच्या हप्त्याचा क्रमांक |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ |
| १ | सांगली मिरज कुपवाड | भुयारी गटार | ५६.५३ | ३९.५७१ | १६.९५९ | २८.२६५० | २८.२६५० | १४.१४ | १४.१२५ | **१४.१२५** | दुसरा |

**०२.** संदर्भाधीन क्रमांक ०४ येथील शासन निर्णयाच्या तरतूदीच्या अनुषंगाने परिच्छेद २ (ज) येथील अटी व शर्तीची पूर्तता केल्यानंतर सदरहू नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेस सुधारीत वित्तीय आकृतीबंधानुसार अनुज्ञेय ठरणारा उर्वरित निधी सांगली मिरज कुपवाड महानगरपालिकेस वितरीत केला जाईल.

**०३.** उपरोक्त नमूद केल्यानुसार निधीचे वितरण करण्यासाठी आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांना नियंत्रक अधिकारी व सहायक संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सहायक संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांनी सदर अनुदान रुपये चौदा कोटी, बारा लक्ष, पन्नास हजार (रुपये १४,१२,५०,०००/-) इतक्या रक्कमेचा धनादेश आयुक्त,सांगली मिरज कुपवाड महानगरपालिका (Commissioner,SangliMirajKupwad Municipal Corporation) या नावे काढून तो आयुक्त,सांगली मिरज कुपवाड यांच्याकडे सुपूर्द करावा व केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.

**०४.** उपरोक्त अनुदानाचा वापर करण्याच्या दृष्टीने खालील अटींचे पालन करणे संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेवर बंधनकारक राहील.

**अ)** सदर निधीचा विनियोग ज्या कारणांसाठी निधी मंजूर केला आहे त्याच कारणांसाठी करण्यात यावा. सदर निधी खर्च झाल्यानंतर त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र, तसेच प्रकल्पाचे उद्दिष्ट व साध्य याची माहिती सादर करणे बंधनकारक राहील. सदर निधीचा प्रकल्पाव्यतिरिक्त इतर बाबींवरील खर्च ही आर्थिक अनियमितता मानली जाईल.

**ब)** सदर प्रकल्पाकरिता मंजूर किंमतीपेक्षा निविदा स्वीकृतीची किंमत अधिक असल्यास त्याचे दायित्व संबंधित महानगरपालिकेचे राहील.

**क)** प्रकल्प किंमतीपैकी नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचा स्वहीस्सा उभारण्याकरिता संबंधीत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने विहित वित्तीय संस्थेकडून कर्ज घेतले असल्यास त्या कर्जाच्या रकमेची परतफेड नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने प्रामुख्याने वित्त आयोगातील प्राप्त होणाऱ्या निधीतून करण्याचे नियोजन करावे. सदर स्त्रोतातून संबंधीत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेस प्राप्त होणाऱ्या रकमा, प्रकल्पांतर्गत घेतलेल्या कर्जापोटी शासनाने परस्पर वळती करून संबंधीत वित्तीय संस्थेस कर्जाच्या परतफेडीपोटी वर्ग करण्यास संबंधीत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेची संमती असल्याचा ठराव महानगरपालिकेने करून त्याची प्रत राज्यस्तरीय नोडल यंत्रणेमार्फत शासनास सादर करावी.

**ड)** राज्य शासनाकडून प्राप्त होणाऱ्या अनुदानाच्या प्रमाणात निधी उभा करून प्रकल्प कार्यावर खर्च करणे संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेवर बंधनकारक राहील. तसेच प्रकल्प पूर्ण झाल्यानंतर प्रकल्प पूर्णत्वाचे प्रमाणपत्र सादर करणे नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेवर बंधनकारक राहील.

**इ)** संदर्भाधीन क्र. ४ येथील शासन निर्णयान्वये अनुज्ञेय वित्तीय आकृतीबंधानुसार निधी प्राप्त होण्यासाठी सदर शासन निर्णयातील अटी व शर्तीची पूर्तता करून सविस्तर प्रस्ताव नगरपरिषद प्रशासन संचालनालयामार्फत सादर करण्यात यावा. तद्नंतरच उर्वरित निधी वितरणाबाबत आवश्यक उचित कार्यवाही करता येईल.

**०५.** या योजनेंतर्गत प्रकल्पाच्या अंमलबजावणीचा तसेच सुधारणा क्षेत्रातील प्रगतीचा अहवाल नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने वेळोवेळी राज्यस्तरीय नोडल यंत्रणेमार्फत राज्य शासनास सादर करावा.

०६. सदर शासन निर्णयान्वये प्राप्त निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र उपलब्ध करून संबंधित महालेखापाल कार्यालयाकडे सादर करण्याची जबाबदारी नियंत्रक अधिकारी या नात्याने आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांची राहील.

०७. सदर प्रयोजनात होणा-या रुपये चौदा कोटी, बारा लक्ष, पन्नास हजार (रुपये १४,१२,५०,०००/-) इतक्या रक्कमेचा खर्च हा "नगर विकास विभाग- मागणी क्रमांक एफ-२, २२१७, नगर विकास, १९१, महानगरपालिकांना सहाय्य, (००) (५७) महाराष्ट्र नगरोत्थान महाभियानांतर्गत महानगरपालिकांसाठी सहाय्यक अनुदान (२२१७ ८०२१) ३१, सहाय्यक अनुदान (वेतनेतर)" या लेखा शिर्षाखालील सन २०१४-१५ या वर्षीच्या मंजूर आर्थिक तरतुदीमधून भागविण्यात यावा.

०८. सदर शासन निर्णय हा वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.३६/व्यय-३, दिनांक २०/०१/२०१५अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२१२१६३२१७८३२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

Jayasingrao Nanasaheb Patil

Digitally signed by Jayasingrao Nanasaheb Patil
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Jayasingrao Nanasaheb Patil
Date: 2015.02.12 16:44:08 +05'30'

**(ज.ना.पाटील)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपूर.
३. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.

६. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.

७. अधिदान व लेखाधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, वांद्रे (पू), मुंबई.

८. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, तथा नोडल एजन्सी.

९. सहायक संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई

१०.उप सचिव (नवि-४), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

११.जिल्हाधिकारी, सांगली.

१२.आयुक्त,सांगली मिरज कुपवाड महानगरपालिका,सांगली.

१३.निवडनस्ती, नवि-३३.